सन २०२४-२५ या वर्षासाठी महिला किसान सशक्तीकरण परियोजना सर्वसाधारण प्रवर्गासाठी (General) अर्थसहाय्य.

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मजिअ-२०२५/प्र.क्र.१५/योजना-३**
मंत्रालय,मुंबई ४०० ०३२.
दिनांक: २७ मार्च,२०२५

वाचा :-

१. शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.एमकेएसपी-२०१३/प्र.क्र.२६६/योजना-३, दिनांक १७ डिसेंबर, २०१३.
२. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दिनांक २५ जुलै, २०२४.
३. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दिनांक १५ ऑक्टोंबर, २०२४.
४. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.१०८/अर्थ-३,दिनांक ०८ जानेवारी, २०२५.
५. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दिनांक १७ मार्च, २०२५.
६. केंद्रिय ग्रामीण विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.के-११०११/०४/२०२२-२३/एमकेएसपी/आयएफसी/एमएच, दिनांक २१ मार्च,२०२५.
७. मुख्य कार्यकारी अधिकारी, एसएसआरएलएम, बेलापूर, नवी मुंबई यांचे पत्र क्र.एमएसआरएलएम/वि.व.ले./कार्या-०४/जा.क्र.९९१/२०२५, दिनांक २३ मार्च, २०२५.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने सन २०२४-२५ या आर्थिक वर्षासाठी महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानांतर्गत महिला किसान सशक्तीकरण परियोजना सर्वसाधारण प्रवर्गासाठी (General) संदर्भाधीन क्र.२ अन्वये पहिल्या हप्त्याचा दुसरा टप्पा म्हणून रु.३,६२,७३,०००/- इतका निधी वितरीत केलेला आहे. सदर निधी राज्याच्या एकत्रित निधीमध्ये जमा झालेला आहे. सुधारीत अंदाजामध्ये सन २०२४-२५ मध्ये महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान (MSRLM) अंतर्गत महिला किसान सशक्तीकरण परियोजना सर्वसाधारण प्रवर्गासाठी (General) केंद्र हिस्सा (२५०१ २८९१) याकरिता रु.१२,००,००,०००/- इतकी तरतूद करण्यात आली आहे. तसेच राज्य हिस्सा (२५०१ २८३७) याकरिता रु.८,००,००,०००/- इतकी तरतूद करण्यात आली आहे. सदर उपलब्ध करुन देण्यात आलेल्या तरतूदीमधून केंद्र हिस्सा रु.३,६२,७३,०००/- व केंद्र हिस्सा समरुप राज्य हिस्सा रु.२,४१,८२,०००/- असा एकूण रु.६,०४,५५,०००/- इतका निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

सन २०२४-२५ मध्ये महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान (MSRLM) अंतर्गत महिला किसान सशक्तीकरण परियोजना सर्वसाधारण प्रवर्गासाठी (General) केंद्र हिस्सा (२५०१ २८९१) याकरिता केलेल्या तरतूदीतून रु. ३,६२,७३,०००/- (रुपये तीन कोटी बासष्ठ लाख त्र्याहत्तर हजार फक्त) व केंद्र हिस्सा समरुप राज्य हिस्सा (२५०१ २८३७) याकरिता केलेल्या तरतूदीतून रु.२,४१,८२,०००/- (रुपये दोन कोटी एकेचाळीस लाख ब्याऐंशी हजार फक्त) असा एकूण रु.६,०४,५५,०००/- (रुपये सहा कोटी

चार लाख पंचावण्ण हजार फक्त) इतका निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली (B.D.S) द्वारे महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानास वितरीत करण्यात येत आहे.

२. सदर रक्कम उप संचालक (वित्त व लेखा), महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, बेलापूर, नवी मुंबई यांच्याकडे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून सुपूर्द करण्यात येत आहे.

३. सदर रक्कम रु. ३,६२,७३,०००/- (रुपये तीन कोटी बासष्ठ लाख त्र्याहत्तर हजार फक्त) चा खर्च " मागणी क्र.एल-३, २५०१ ग्रामविकासासाठी विशेष कार्यक्रम, ०६, स्वयंरोजगार कार्यक्रम, १०१, सुवर्ण जयंती ग्राम स्वयंरोजगार योजना, (०१) सुवर्ण जयंती ग्राम स्वयंरोजगार, (०१)(१२) आजीविका (एमएसआरएलएम) अंतर्गत महिला किसान सशक्तीकरण परियोजेनेस वित्तीय सहाय्य (केंद्राचा हिस्सा ६० टक्के) (कार्यक्रम), ३३, अर्थसहाय्य (२५०१ २८९१)" या लेखाशिर्षाखाली व रु.२,४१,८२,०००/- (रुपये दोन कोटी एकेचाळीस लाख ब्याऐंशी हजार फक्त) चा खर्च “मागणी क्र.एल-३, २५०१ ग्रामविकासासाठी विशेष कार्यक्रम, ०६, स्वरोजगार कार्यक्रम, १०१, स्वर्णजयंती ग्राम स्वरोजगार योजना, (०१) स्वर्णजयंती ग्राम स्वरोजगार योजना, (०१) (०८) आजिविका (एमएसआरएलएम) अंतर्गत महिला किसान सशक्तीकरण परियोजनेस वित्तीय सहाय्य (राज्य हिस्सा ४०%) (कार्यक्रम), ३३, अर्थसहाय्य (२५०१ २८३७)” या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पीत केलेल्या तरतूदी मधून भागवावा.

४. हे अनुदान ज्या प्रयोजनाकरीता मंजूर करण्यात आलेले आहे, त्याच प्रयोजनाकरीता खर्च करण्यात यावे. अन्यथा ती वित्तीय अनियमितता समजण्यात येईल, याची अमंलबजावणी करणाऱ्या अधिकाऱ्यांनी नोंद घ्यावी.

५. महिला किसान सशक्तीकरण परियोजना (MKSP) ही योजना केंद्र पुरस्कृत असल्याने, या शासन निर्णयाव्दारे वितरीत होणारा निधी संबंधित योजनेच्या Single Nodal Agency (SNA) खात्यामध्ये वर्ग करण्यात यावा.

६. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेले अनुदान कोषागारातून काढल्यानंतर पुढील माहिती त्वरीत लेखाधिकारी कार्यासन क्रमांक योजना-२, ग्राम विकास विभाग यांचेकडे पाठवावी. १) मंजूर केलेली रक्कम, २) कोषागारातून काढलेली रक्कम, ३) रक्कम काढल्याचा प्रमाणक क्रमांक व दिनांक, ४) महालेखापाल कार्यालयातील रक्कमेशी ताळमेळ केल्याचे प्रमाणपत्र, ४) या योजनेची प्रगती / सद्य:स्थिती दर ४ महिन्यांनी शासनास कळविण्यात यावी.

७. सदर शासन निर्णय वित्त विभाग परिपत्रक्र दिनांक २५.०७.२०२४, १५.१०.२०२४, ०८.०१.२०२५ व दिनांक १७.०३.२०२५ अन्वये दिलेल्या केंद्र पुरस्कृत योजनांसाठी निधी तसेच राज्य शासनाचा समरुप हिस्सा प्रशासकीय विभागांने त्यांचे स्तरावर वितरित करण्याच्या प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. वाचा येथील संदर्भ क्र.२,३,४ व ५ येथे नमूद वित्त विभाग शासन परिपत्रक दिनांक २५.०७.२०२४, १५.१०.२०२४, ०८.०१.२०२५ व दिनांक १७.०३.२०२५ मधील सूचनांचे तंतोतंत पालन करण्याची दक्षता आहरण व संवितरण अधिकारी यांनी घ्यावी.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२७१०५२५७४३२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VIVEK ASHOK DAINGADE

Digitally signed by VIVEK ASHOK DAINGADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=53c2fccec74ddb1c052589e5cbaed9d19ba0d0043df169c83be27faeb8bf045b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=670EB0FA576F65F4406D031E11A90EA6FFB3AEFB253D401F5CED2AD1A6605DBF, cn=VIVEK ASHOK DAINGADE
Date: 2025.03.27 11:31:47 +05'30'

**( विवेक दाईंगडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) महालेखापाल (लेखा परिक्षा) व (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
२) प्रधान सचिव व निवासी आयुक्त (गुंतवणूक व राजशिष्टाचार), महाराष्ट्र सदन, नवी दिल्ली.
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, ५ वा मजला, दक्षिण विंग (एसबीआय साईड),सिडको भवन, सीबीडी बेलापूर, नवी मुंबई - ४०० ६१४.
४) उप संचालक (वित्त व लेखा), महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, ५ वा मजला, दक्षिण विंग (एसबीआय साईड),सिडको भवन, सीबीडी बेलापूर, नवी मुंबई - ४०० ६१४.
५) जिल्हा कोषागार अधिकारी , ठाणे,
६) उप कोषागार अधिकारी, कोकण भवन, बेलापूर, नवी मुंबई.
७) नियोजन विभाग (१४१४), मंत्रालय, मुंबई-३२.
८) वित्त विभाग (व्यय-१५) व ( अर्थ-१७) मंत्रालय मुंबई-३२.
९) कार्यासन अधिकारी, वित्त-१, वित्त-७, योजना-२, ग्राम विकास विभाग.
१०) निवड नस्ती.